**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब ( प्रशासन शाखा) मधील अधीक्षक पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करणे बाबत..**

**श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः ईएसटी-१००९ /प्र.क्र.३४५/प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना**

श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांची अधीक्षक, सामान्य राज्यसेवा (वर्ग-२) (लिपीक संवर्ग) या संदर्भामध्ये सरळसेवा प्रवेशाने दिनांक ०६.०९.१९९३ च्या आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली असून श्री. उबरहंडे हे या पदावर दिनांक ३०.०९.१९९३ रोजी हजर झाले होते.

२. सामान्य राज्यसेवा वर्ग-२ (लिपीक संवर्ग) अधीक्षक या संवर्गातून महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट ब (प्रशासन शाखा) मधील अधीक्षक या संवर्गातील पदोन्नतीसाठीच्या सन १९९८-९९ या वर्षाच्या निवडसूची दरम्यान श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी सुरू असल्याने तसेच त्यांचा परिविक्षा कालावधी समाप्त झाला नसल्याने त्यांचा उक्त निवडसूचीतून पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नाही. श्री. उबरहंडे यांच्याविरुद्ध सुरू करण्यात आलेल्या विभागीय चौकशी प्रकरणाचा अंतिम निर्णय होऊन शासन आदेश दिनांक ०६.०९.१९९९ अन्वये त्यांना "ठपका" ठेवण्याची शिक्षा देण्यात आली. शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णय दिनांक २३.०४.२००१ अन्वये त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यात आला व त्यांची सेवा दि. ३०.०९.१९९६ पासून पुढे चालू ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला.

३. श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांना परिविक्षा कालावधी पूर्ण केल्यामुळे दिनांक ३०.१०.२००१ च्या निवड समितीच्या बैठकीत त्यांचा पदोन्नतीसाठी विचार होऊन निवड समितीने त्यांना पदोन्नतीसाठी पात्र ठरविले. त्यानुसार दिनांक १५.११.२००३ च्या आदेशान्वये श्री. उबरहंडे यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (प्रशासन शाखा) संवर्गातील अधीक्षक या पदावर पदोन्नती देण्यात आली व ते दि. २५.११.२००३ रोजी पदोन्नतीच्या पदावर प्रत्यक्ष रुजू झाले.

४. श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांच्याविरुद्ध सुरू करण्यात आलेल्या विभागीय चौकशीअंती त्यांना ठपका ठेवण्याची शिक्षा बजावण्यात आली असल्याने ते सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक दिनांक ०६.०६.२००२ नुसार मानीव दिनांकासाठी पात्र ठरतात सबब, श्री. उबरहंडे यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट ब (प्रशासन शाखा) अधीक्षक पदावरील पदोन्नतीचा दिनांक २०.१२.१९९९ हा मानीव दिनांक देवून त्यांची उक्त संवर्गामधील सेवाज्येष्ठता ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांच्याविरुद्ध सुरू करण्यात आलेल्या विभागीय चौकशी प्रकरणाचा अंतिम निर्णय होऊन शासन आदेश दिनांक ०६.०९.१९९९ अन्वये त्यांना “ठपका” ठेवण्याची शिक्षा देण्यात आली असल्यामुळे सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक दि. ०२.०४.१९७६ मधील तरतुदीनुसार अधीक्षक, (महाराष्ट्र शिक्षण सेवा) या पदावरील पदोन्नतीसाठीच्या सन १९९८-९९ वर्षाच्या निवडसूचीत श्री. उबरहंडे यांचे स्थान ५ स्थान खाली आणून त्यांना सेवाकनिष्ठ श्री. एच.बी.शिंदे यांच्या नंतर निश्चित करण्यात येत आहे. तसेच श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांना श्री. एस. एस. पागे हे महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब ( प्रशासन शाखा) संवर्गातील अधीक्षक या पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्याचा दिनांक २०.१२.१९९९ हा पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर मानीव दिनांक हा सेवाज्येष्ठता निश्चितीसाठी ग्राहय धरण्यात यावा. श्री. मनोजकुमार हसनराव उबरहंडे यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब ( प्रशासन शाखा) संवर्गातील अधीक्षक पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक २०.१२.१९९९ ते प्रत्यक्ष पदोन्नतीच्या पदावर रुजू दिनांक २५.११.२००३ पर्यंतच्या कालावधीत काल्पनिक वेतननिश्चित करण्यात यावी. सदर कालावधीतील काल्पनिक वेतननिश्चितीच्या अनुषंगाने वेतन व भत्यांची थकबाकी श्री. उबरहंडे यांना अनुज्ञेय राहणार नाही.

३. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. १०३९/का-१२, दिनांक २४.०९.२०२१ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ३९८/२१/सेवा-३, दिनांक १८.११.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०७१४४५१५४९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a8b4d56939f92ca00d0f1036f37e5c0743e0f0aea72b2f23cc46d5945ab37d69, pseudonym=0BFE14F7A1A9C39851527D3E05D62CA529C327D7, serialNumber=8E3FEAC5ACB11AE3D9464A8A336D7067314E8F58B632FCBB7B5B4CF900C4649B, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2021.12.07 14:52:30 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२ सर्व शिक्षण संचालक
३. संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक.
४. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
५. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)